सन २०२४-२५ मधील अर्थसंकल्पिय
तरतूदीचे वितरण करणेबाबत.
डॉ.पंजाबराव देशमुख व्याज सवलत
योजना (२४२५१००९)-३३ अर्थसहाय्य

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र.अर्थसं ०४२४/ प्र.क्र.११५/१८-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २७.०३.२०२५

**वाचा :-**

१. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, क्रमांक सीसीआर ०६१२/प्र.क्र.२६९/२-स, दिनांक ०३/१२/२०१२

२. वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा-प्रशा ५, दि.१०/०५/२०१६

३. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, क्रमांक संकीर्ण-०५२१/प्र.क्र.६०/ १८-स, दिनांक ११/०६/२०२१

४. वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१/०४/२०२४

५. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, क्रमांक अर्थसं-०५२३/प्र.क्र.१३६/१८-स, दिनांक २९/०३/२०२४.

६. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, क्रमांक अर्थसं-०४२४/प्र.क्र.११५/१८-स, दिनांक ०२/०७/२०२४.

**प्रस्तावना :-**

राज्यातील शेतकऱ्यांना सहकारी कृषी पतसंस्थांमार्फत व्याज दरात वसुलीशी निगडीत प्रोत्साहनात्मक सवलत देण्याचा निर्णय शासनाने दिनांक २४/११/१९८८ च्या शासन निर्णयान्वये घेतला आहे. त्यानुसार दिनांक ०२/११/१९९१ च्या शासन निर्णयानुसार डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजना दिनांक ०१/०४/१९९० पासून पीक कर्ज घेतलेल्या शेतकऱ्यांना लागू करण्यात आली आहे. या योजनेअंतर्गत सहकारी कृषी पतसंस्थेकडून पीक कर्ज घेणाऱ्या व त्याची प्रतिवर्षी ३० जूनपर्यंत संपूर्ण परतफेड करणाऱ्या शेतकऱ्यांना व्याज सवलत देण्यात येत आहे. राष्ट्रीयकृत बँका, ग्रामीण बँका व खाजगी बँकांकडून कर्ज घेणाऱ्या शेतकऱ्यांनाही सदर योजना लागू आहे. मात्र थकीत कर्जास तसेच मध्यम मुदत व दीर्घ मुदत कर्जास सदरची योजना लागू नाही. या योजनेअंतर्गत शेतकऱ्यांना सहकारी कृषी पतसंस्थांमार्फत व बँकांमार्फत मिळणाऱ्या पीक कर्जावरील व्याज दराशी निगडीत व्याज सवलत देण्यात येत आहे. दिनांक ०३/१२/२०१२ रोजीच्या शासन निर्णयानुसार रूपये १.०० लाखापर्यंतच्या पीक कर्जावर वार्षिक ३% व त्यापुढील रूपये ३.०० लाखापर्यंतच्या पीक कर्जावर वार्षिक १% दराने व्याज सवलत लागू करण्यात आलेली आहे. तसेच शासनाने दिनांक ११/०६/२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये रुपये ३.०० लाख मर्यादेपर्यंत अल्पमुदत पीक कर्ज घेऊन त्याची मुदतीत परतफेड करणाऱ्या शेतकऱ्यांना ३% व्याज सवलतीचा लाभ देण्यात येत आहे. त्यानुसार राज्य शासनाची ३% व्याज सवलत आणि केंद्र शासनाची ३% व्याज सवलत विचारात घेऊन सदर कर्ज शेतकऱ्यांना शुन्य टक्के (०%) दराने उपलब्ध होणार आहे.

डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजनेअंतर्गत वाचा क्र. ६ अन्वये सन २०२४-२५ मधील रूपये ३०० कोटी अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी रू.१३५ कोटी एवढा निधी वितरीत करण्यास मान्यता दिली आहे. राज्य शासनाच्या धोरणास अनुसरून डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजनेअंतर्गत उर्वरित अर्थसंकल्पिय तरतूदीचा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

सन २०२४-२५ या वर्षात डॉ.पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजनेअंतर्गत (२४२५ १००९)-३३ अर्थसहाय्य खाली रु.३००.०० कोटी अर्थसंकल्पित तरतूद असून त्यापैकी वाचा क्र. ६ अन्वये रु. १३५.०० कोटी इतका निधी वितरणास मान्यता दिल्याने उर्वरित रक्कम रु. १६५.०० कोटी (रूपये एकशे पासष्ट कोटी फक्त) एवढ्या निधीचे वितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१/०४/२०२४ मधील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता होत आहे.

३. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेला निधी संबंधित बँकांना वितरीत करताना आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर रकमेबाबत उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करून घ्यावे व त्याची प्रत शासनास सादर करावी.

४. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी वित्त विभागाच्या उपरोक्त वाचा क्र. ४ येथील शासन परिपत्रकामधील सूचनांचे पालन करावे.

५. सदर तरतूद संबंधित संस्थांना अदा करण्यासाठी V०००४-सहायक निबंधक (अर्थसंकल्प आणि नियोजन) अधीन सहकार आयुक्त व निबंधक, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच लेखाधिकारी, अधीन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी आहरण करून हा खर्च वेळेत होईल हे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे. तसेच याबाबतचा अहवाल व विकास मंडळनिहाय खर्चाची माहिती वेळोवेळी शासनास सादर करावी.

६. सदरहू रक्कम मागणी क्र.व्ही - २ मुख्यलेखाशिर्ष " २४२५ सहकार - (१०७), सहकारी पत संस्थांना सहाय्य (०२) व्याजात सवलत (०२)(०४) डॉ.पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजना (कार्यक्रम) (दत्तमत) (२४२५१००९) ३३, अर्थसहाय्य," या लेखाशिर्षाखालील सन २०२४-२५ या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून सदर रक्कम खर्च करण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक ९२/का. १४३१, दि. १७.०२.२०२५ अन्वये तसेच वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक १६४/२०२५/व्यय-२, दि. ०३.०३.२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२७१८०३०३६९०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH ARUN PATIL

Digitally signed by SANTOSH ARUN PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=ca78467bcc4594e1e11741a7962a7a83feafb176442575037160fc343c4ae5ab, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E52439642AB57C332B2A3E3E46F0D907BA6167409EF6D52C943BF775ECF042FD, cn=SANTOSH ARUN PATIL
Date: 2025.03.27 18:04:15 +05'30'

**( संतोष पाटील )**
**अपर निबंधक तथा सह सचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित :-**

१. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

२. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा.मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. महालेखाकार, महाराष्ट्र- १, मुंबई.
९. महालेखाकार, महाराष्ट्र- २, नागपूर.
१०. समन्वयक, राज्यस्तरीय बँकर्स समिती, बँक ऑफ महाराष्ट्र, पुणे.
११. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक, लि. मुंबई.
१२. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, (सर्व)
१३. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, (सर्व)
१४. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-१३, मंत्रालय, मुंबई.
१५. अवर सचिव (कार्या. १७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. कोषागार अधिकारी, पुणे.
१७. निवड नस्ती-१८-स.